**महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील कक्षांचे नूतनीकरणाकरिता " २७-लहान बांधकामे" या उद्दिष्टांतर्गत पुरवणी मागणीद्वारे अनुदान मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मप्रशा १२१९/४१२/(१७५/१९)/कार्या-१७.**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १७ जानेवारी, २०२०

<u>वाचा:-</u> १) शासन निर्णय,विधि व न्याय विभाग क्र.मप्रशा १२१८/५५८/(१९४/१८)/कार्या-१७, दिनांक ३१.०८.२०१९.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.पूरक-२०१९/प्र.क्र.११५/अर्थ-३, दिनांक ०३ जानेवारी, २०२०

**<u>प्रस्तावना :</u>**

महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील कक्षांचे नूतनीकरणाकरिता रु. २३,६८,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन अ.क्र. (१) येथील दिनांक ३१ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील कक्षांचे नूतनीकरणाकरिता सन २०१९- २०२० या आर्थिक वर्षामध्ये रु. २३,६८,०००/- इतक्या रकमेच्या पुरवणी मागणीस मंजुरी देण्याबाबतचा प्रस्ताव महाराष्ट्र विधानमंडळाच्या हिवाळी अधिवेशनामध्ये सादर करण्यात आला होता. या पुरवणी मागणीस विधानसभेने मान्यता दिली असून, २०१९-२०२० या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपाल महोदयांनी संमती दिली आहे आणि ते महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१९ ( सन २०१९ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.३० ) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दिनांक २६ डिसेंबर, २०१९ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. सदर मंजूर निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय -</u>**

सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षात महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयातील कक्षांचे नूतनीकरणासाठीचा खर्च भागविण्यासाठी रु. २३,६८,०००/-(अक्षरी रु. तेवीस लाख अडुसष्ट हजार फक्त) इतके अनुदान पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आले आहे. सद्यस्थितीत सदर अनुदानाच्या ६० टक्के म्हणजेच रु. १४,२०,८०० ( अक्षरी रु. चौदा लाख वीस हजार आठशे फक्त) इतके अनुदान महाप्रशासक

आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( नियंत्रक अधिकारी संकेतांक क्र. जे ००४२ ) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी मंजूर प्रयोजनासाठीच खर्च करण्यात येईल, याबाबत महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी दक्षता घ्यावी.

३. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र. जे-१, २०१४-न्यायदान (दत्तमत),११०-महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त, (००) (०१) महाप्रशासक आणि शासकीय विश्वस्त ( अनिवार्य ) (२०१४०२५२) २७-लहान बांधकामे " या लेखाशीर्षाखाली करण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक,वित्त विभाग क्र.पूरक-२०१९/प्र.क्र.११५/अर्थ-३, दि.०३ जानेवारी, २०२० व अनौपचारिक संदर्भ क्र.२३/२०/व्यय-५, दि. ०९ जानेवारी, २०२० अन्वये प्राप्त मंजूरीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११७१७२०१२७८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd66db73425a9730e4074ae475eb26788ae32a45d13639a02fcf2ffbd43272ff, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2020.01.17 17:22:07 +05'30'

**( का. रा. पिळणकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रति-**

१) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१ , मुंबई.
२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
४) वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-११),मंत्रालय, मुंबई
५) कार्यासन अधिकारी (कार्या-२३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) कार्यासन १७-संग्रहार्थ.